**वैधानिक विकास मंडळांसाठी ठेवण्यात येत असलेल्या नियतव्ययातून घ्यावयाच्या कामांबाबत मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती**

**महाराष्ट्र शासन,**
**नियोजन विभाग,**
शासन निर्णय क्रमांक:- वैं.व्रमं-१००१/प्र.क्र.१७१/का.१४५२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ ऑगस्ट २००१.

## प्रास्ताविक

वैधानिक विकास मंडळांच्या स्थापनेपासून म्हणजे सन १९९५-९६ पासून मंडळांच्या शिफारशींनुसार घ्यावयाच्या कामांसाठी तीनही विकास मंडळांसाठी प्रतिवर्षी वार्षिक योजनेत स्वतंत्र नियतव्यय ठेवण्यात येतो. या नियतव्ययाचे तीनही विकास मंडळांना वाटप मा.राज्यपालांच्या निदेशानुसार करण्यात येते. सदर नियतव्ययाच्या अनुषंगाने विकास मंडळांकडून निरनिराळी विकास कामे सुचविली जातात व त्यासाठी त्यांचेकडून आवश्यक त्या नियतव्ययाची शिफारस केली जाते. या शिफारशी विकास मंडळांकडून मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागाकडे पाठविल्या जातात व त्याची प्रत नियोजन विभागास अग्रेषित करण्यात येते. शिफारशी प्राप्त झाल्यावर संबंधित प्रशासकीय विभाग त्या कामाची तपासणी म्हणजे शिफारस केलेले काम शासनाच्या विहित निकष/मापदंडाप्रमाणे घेता येणे शक्य आहे याची खात्री करणे, कामांचे अंदाजपत्रक तयार करुन तांत्रिक व आवश्यक तेथे प्रशासकीय मान्यता देणे, इत्यादी बाबींची पूर्तता करुन शिफारस केलेल्या कामाचा नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यासाठी पुरवणी मागणी प्रस्ताव नियोजन व वित्त विभागाकडे मान्यतेसाठी सादर करतात. नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेनंतर व विधी मंडळाने पुरवणी मागणी विधेयक संमत केल्यानंतर विकास मंडळाने शिफारस केलेला नियतव्यय अर्थसंकल्पीत होतो व नंतर त्याचे वितरण संबंधित प्रशासकीय विभागाकडून कार्यान्वयीन यंत्रणेला कामाच्या अंमलबजावणीसाठी केले जाते. या पध्दतीमध्ये फार विलंब होत असल्याचे दिसून आले आहे. हे टाळण्यासाठी तसेच या नियतव्ययातून घ्यावयाच्या कामाबाबत कार्यपध्दती आणि मार्गदर्शक सूचना निश्चित करण्यासंबंधीची बाब शासनाच्या काही काळ विचाराधीन होती.

## शासन निर्णय

वैधानिक विकास मंडळांनी त्यांच्यासाठी ठेवण्यात आलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने सुचविलेली कामे घेण्यासाठी त्याबाबतची कार्यपध्दती आणि मार्गदर्शक सूचना सोबतच्या प्रपत्रानुसार विहित करण्यात येत आहेत. सर्व संबंधितांनी या कार्यपध्दतीची व मार्गदर्शक सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-६०५/२००१/व्यय-८, दिनांक- १३.८.२००१ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

20100226185328001

( रा.शं.कुलकर्णी )
सह सचिव, नियोजन विभाग

प्रति

(१) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
(२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
(३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
(४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
(५) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-१५)
(६) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५
(७) सदस्य सचिव, विदर्भ विकास मंडळ, द्वारा- विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
(८) सदस्य सचिव, मराठवाडा विकास मंडळ, द्वारा- विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
(९) सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळ, द्वारा- विभागीय आयुक्त, कोकण विभाग, जुने सचिवालय, मुंबई
(१०) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
(११) सर्व विभागीय आयुक्त,
(१२) निरनिराळ्या विभागांतील विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख
(१३) सर्व जिल्हाधिकारी
(१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
(१५) नियोजन विभागातील सर्व अधिकारी

# वैधानिक विकास मंडळासाठी असलेल्या विशेष नियतव्ययातून घ्यावयाच्या कामांबाबत मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती

## प्रस्ताविक

वैधानिक विकास मंडळे अस्तित्वात आल्यानंतर सन १९९५-९६ पासून वार्षिक योजनेमध्ये या मंडळानी सुचविलेली कामे घेण्यासाठी स्वतंत्र नियतव्यय ठेवण्यात आलेला आहे. सुरुवातीच्या वर्षात वैधानिक विकास मंडळाने सुचविलेली कामे शासकीय कार्यपध्दतीमध्ये बसवून घेण्यामध्ये वेळेची कमतरता विचारात घेऊन हा अतिरिक्त नियतव्यय ठेवण्यात आला होता. तसेच पुढील वर्षभरामध्ये मंडळानी सुचविलेली कामे शासकीय कार्यपध्दती तपासून ती हाती घेण्याची सोय रहावी हा विचार ठेवून अशा नियतव्ययाची तरतूद करण्यात आली होती.

भारतीय राज्य घटनेच्या कलम-३७१(२) अन्वये विदर्भ, मराठवाडा यव उर्वरित महाराष्ट्र यासाठी तीन वैधानिक विकास मंडळे मा.राज्यपालांच्या दि. ३०.४.१९९४ च्या आदेशान्वये स्थापन करण्यात आली आहेत. स्थापन झालेल्या या वैधानिक विकास मंडळाची महत्वाची कामे म्हणजे संपूर्ण राज्याच्या तुलनेत विविध विकास क्षेत्रांमध्ये आपापल्या क्षेत्रांच्या विकासाची पातळी निश्चित कारणे तसेच अनुशेष दूर करण्याच्या दृष्टीने विविध विकास कामांच्या परिणामांचे मूल्यमापन करणे हे आहे. त्याचप्रमाणे वार्षिक व पंचवार्षिक योजनेमध्ये विकास क्षेत्रातील खर्चासंबंधी नियतव्यय सुचविणे हेही एक मंडळाचे महत्वाचे काम आहे.

सन १९९५-९६ मध्ये १०० कोटी रुपयांचा नियतव्यय अतिरिक्त म्हणून ठेवण्याचा अपवादात्मक निर्णय पुढच्या काळामध्ये कायम स्वरुपी चालू राहिला आहे. कारण वैधानिक विकास मंडळांनी वार्षिक योजनेंतर्गत सुचविलेल्या योजनांचा नंतरच्या काळामध्ये साधनसंपत्तीची कमतरता व वार्षिक योजनेतील बांधील स्वरुपाच्या योजनांवरील खर्चाच्या बाबी तसेच प्रशासकीय कार्यपध्दतीमुळे (योजनांना प्रशासकीय तांत्रिक मंजूरी) पुरेसा विचार होऊ शकला नाही. त्यामुळे या मंडळांच्या कार्यक्षेत्रामध्ये त्यांच्या दृष्टीने महत्वाची कामे घेण्यासाठी दुसरा मार्ग म्हणजे १०० कोटीचा नियतव्यय हा योजनेच्या प्रक्रियेमध्ये रुढ झालेला आहे. याचा एक परिणाम असा झाला आहे की,

शासनाचा विकास मंडळाकडे पाहण्याचा दृष्टीकोन हा रचनात्मक व प्रतिसादात्मक आहे हे त्यामुळे जनमानसात स्पष्ट झाले आहे.

विकास मंडळांच्या शिफारशीनुसार विविध योजनांसाठी ठेवण्यात आलेला नियतव्यय अर्थसंकल्पित करुन खर्च करण्याच्या प्रक्रियेसंबंधी मागील पांच वर्षाच्या अंमलबजावणीचा अनुभव विचारात घेतल्यास त्यामध्ये प्रामुख्याने दोन प्रकारच्या अडचणी लक्षात आलेल्या आहेत. पहिली अडचण अशी आहे की, या पध्दतीनुसार वैधानिक विकास मंडळे, विविध कार्यक्रमांसाठी प्रशासकीय विभागांकडे नियतव्ययाची शिफारस करीत असतात. प्रशासकीय विभागांचे क्षेत्रीय अधिकारी मंडळांनी शिफारस केलेल्या कार्यक्रमांची तपासणी करुन आपआपल्या प्रशासकीय विभागांकडे प्रस्ताव पाठवितात. राज्य पातळीवरील प्रशासकीय विभाग त्याची तपासणी करुन शिफारस केलेला नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यासाठी नियोजन व वित्त विभागामार्फत कार्यवाही करतात. या कार्यपध्दतीमुळे बराच कालावधी जातो. मंडळाने सुचविलेले प्रकल्प/योजना राज्य स्तरावरील मंत्रालयीन पातळीवर तपासणी करण्याची गरज या कार्यपध्दतीमुळे आहे. परिणामी प्रत्येक योजनांची अर्थसंकल्पित तरतूद होऊन प्रशासकीय आदेश निर्गमित होईपर्यन्त बराच कालावधी जातो व वैधानिक विकास मंडळाचा निधी अखर्चित राहतो त्यामुळे या कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याची गरज निर्माण झालेली आहे.

या योजनेच्या अंमलबजावणीची दुसरी अडचण म्हणजे या नियतव्ययातून घ्यावयाची कामे निश्चित करण्यासंबंधीची आहे. सध्याच्या कार्यपध्दतीनुसार विविध प्रशासकीय विभाग किंवा जनतेचे प्रतिनिधी किंवा वैधानिक विकास मंडळांनी स्वतः सुचविलेली कामे अशी अनेक कामे मंडळाकडून शिफारशीसह येतात. या कामांचा त्यामधून प्राथम्य क्रम ठरवून वार्षिक योजना व पंचवार्षिक योजनांचे उद्दिष्ट व विकास क्षेत्रातील धोरण समोर ठेवून वैधानिक विकास मंडळानी शिफारस केलेला नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यास फार वेळ जातो, त्यामुळे या नियतव्ययातून कोणती कामे घेता येतील आणि कोणती कामे घेता येणार नाहीत आणि कोणती कामे डोळयासमोर ठेवणे आवश्यक आहे हे निश्चित झाल्यास वैधानिक विकास मंडळांना योजना निश्चित करणे सोयीचे जाईल व त्याप्रमाणे त्यांना कामे सुचविणे सुलभ होईल. विकास मंडळांसाठी असलेल्या नियतव्ययातून घ्यावयाची कामे ही राज्य शासनाच्या धोरणाशी सुसंगत आणि

विहित निकष व कार्यपध्दतीचा अवलंब करुन कार्यान्वित करावयाची आहेत. त्याचा विचार करता याबाबत आता खालील कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचना विहित करण्यात येत आहेत :-

**नियतव्यय अर्थसंकल्पित करुन वितरणाची पध्दती**

१. वार्षिक योजनेअंतर्गत तिन्ही विकास मंडळांसाठी ठेवण्यात आलेला नियतव्यय मार्चमधील अर्थसंकल्पीय अधिवेशनात एकत्रितपणे नियोजन विभागाने खालील स्वतंत्र उपलेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करावा:-

"मागणी क्र.ओ-६ - ३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा - ०९० - सेक्रेटरीएट (तीन) वैधानिक विकास मंडळे (बी) वैधानिक विकास मंडळांच्या क्षेत्रातील विकास कार्यक्रम - (३४५१-०६३-६) योजनांतर्गत/दत्तमत्त."

२. या संदर्भात खालील विहित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार अनुज्ञेय असलेल्या कामांसाठी विकास मंडळांनी त्यांच्या विशेष नियतव्ययातून कामाची व त्यासाठी लागणाऱ्या नियतव्ययाची शिफारस करावी.

३. ही शिफारस विकास मंडळांनी संबंधित विभागाच्या प्रादेशिक प्रमुखांना पाठवावी व त्याची प्रत मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व नियोजन विभाग यांना अग्रेषित करावी.

४. प्रादेशिक प्रमुखांनी विकास मंडळांनी शिफारस केलेल्या कामाची सविस्तर तपासणी करुन व प्राकलन व आराखडे तयार करुन त्याबाबतचा प्रस्ताव मंत्रालयातील त्यांच्या प्रशासकीय विभागाकडे सादर करावा.

५. संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी अशा प्रस्तावांची छाननी करुन निधीच्या मागणी बाबतचा व आवश्यक तेथे प्रशासकीय मान्यतेबाबतचा प्रस्ताव नियोजन विभागास सादर करावा. प्राथमिक शाळा खोल्या, ग्रामपंचायत कार्यालय, अंगणवाडी बांधकाम अशा कामांसाठी शासनाने टाईप डिझाईन व कमाल निधी ठरवून दिलेला आहे अशा कामांना प्रशासकीय मंजुरी देण्याची आवश्यकता नाही.

६. नियोजन विभागाने या प्रस्तावांची तपासणी करुन तत्वत: प्रशासकीय सहमती द्यावी व प्रस्ताव संबंधित विभागाकडे सविस्तर प्रशासकीय मान्यतेचे आदेश

काढण्यासाठी परत पाठवावा त्याचबरोबर विकास मंडळाने शिफारस केलेल्या कामाची अंमलबजावणी करण्यासाठी उपरोक्त अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. पी-५१८/ प्र.क्र.१४६ /९१/अर्थोपाय, दि. १७.५.१९९१ नुसार संबंधित प्रशासकीय विभागाला निधी उपलब्ध करावा.

७. सविस्तर प्रशासकीय मान्यतेचे आदेश संबंधित विभागांनी काढून त्याची प्रत विकास मंडळाकडे माहितीस्तव पाठवावी तसेच नियोजन विभागाने उपलब्ध केलेला निधी संबंधित क्षेत्रीय यंत्रणेला वितरीत करावा.

८. विकास मंडळांनी शिफारस केलेल्या कामांसाठी वितरीत केलेला निधी त्या कामावर खर्च होण्याची शक्यता नसल्यास तसा प्रस्ताव संबंधित प्रशासकीय विभागांनी योग्य वेळी नियोजन विभागाकडे सादर करावा. नियोजन विभागाने असा निधी विकास मंडळांनी शिफारस केलेल्या अन्य कामांसाठी पुनर्विनियोजनाद्वारे संबंधित प्रशासकीय विभागाला उपलब्ध करावा.

**कामांची अंमलबजावणी :-**

विकास मंडळांनी शिफारस केलेल्या कामांसाठी प्रशासकीय विभागाकडून निधीचे वितरण झाल्यानंतर संबंधित यंत्रणांनी (शासकीय यंत्रणा, जिल्हा परिषद/नगर परिषद) नियमानुसार विहीत पध्दतीने कामांची अंमलबजावणी करावी. यंत्रणांकडे सुपूर्द केलेला निधी त्याच कामावर खर्च करावा. काम पूर्ण झाल्यावर कामाच्या पूर्ततेचे व खर्च केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित यंत्रणांनी विकास मंडळाकडे १ महिन्याच्या आत सादर करावे. तसेच काम पूर्ण होई पर्यन्त कामाच्या प्रगतीचा अहवाल दर तीन महिन्याला विकास मंडळाकडे पाठवावा.

**विकास मंडळांनी शिफारस केलेल्या निधीतून घ्यावयाच्या कामांबाबतचे निकषः-**

वैधानिक विकास मंडळांसाठी ठेवण्यात आलेला नियतव्यय हा राज्याच्या एकत्रित निधीतून खर्च करावयाचा आहे. त्यामुळे राज्य शासनाने आखलेल्या योजनांप्रमाणेच विहीत निकष आणि कार्यपध्दतीचा अवलंब करुन या नियतव्ययाचा विनियोग करावा लागेल. त्याचप्रमाणे या नियतव्ययातून ज्या योजना पूर्ण होत आल्या आहेत आणि ज्याचा लाभ लगेच मिळणार आहे अशा योजनांना प्राथम्यक्रम देणे गरजेचे राहिल. वैधानिक विकास मंडळांनी शिफारस केलेल्या योजना हाती घेण्यापूर्वी त्यांची

सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे तयार करणे, विहीत निकष/मापदंडाची पूर्तता याबाबताची खात्री करुन घेणे, सक्षम अधिका-यांनी त्यास प्रशासकीय मान्यता/तांत्रिक मंजुरी देणे, इ.बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहिल. या निधीतून साधारणतः कोणती कामे घ्यावीत याबाबतचे निकष खालीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहेत:-

(१) मंडळाच्या क्षेत्रातील अनुशेष दूर होण्यासाठी विकास मंडळांनी प्राथम्याने निधीची शिफारस करावी. अनुशेषाची कामे नसल्यास अन्य महत्वाच्या निकडीच्या योजनांसाठी निधीचा विनियोग करण्यात यावा.

(२) ज्या कामांसाठी निधी द्यावयाचा आहे ते काम साधारणतः त्या वर्षातच पूर्ण होईल असे असावे. अपवादात्मक प्रसंगी शिल्लक काम कोणत्याही परिस्थितीत दुस-या वर्षी पूर्ण करण्यात यावे व अशा दुस-या वर्षी चालू राहणा-या कामासाठी आवश्यक तो निधी विकास मंडळाने शिफारस करावा.

(३) राज्य शासनाने मंजुरी दिलेले प्रकल्प/योजनांसाठी निधी काही वेळा अपुरा असतो. यास्तव असे मंजूर प्रकल्प/योजना पूर्ण होण्याच्या दृष्टीने वैधानिक विकास मंडळांना त्यांच्या नियतव्ययातून पूरक निधी म्हणून देता येईल.

(४) स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय महामंडळे, विद्यापीठे अथवा नोंदणीकृत सार्वजनिक संस्था (registered bodies) यांना सार्वजनिक कामांसाठी अनुदान द्यावयाचे असल्यास संबंधित प्रकल्पास शासनाच्या सर्वसाधारण धोरणानुसार संबंधित प्रशासकीय विभागाची मान्यता मिळाली पाहिजे व अशा मंडळांना/संस्थांना द्यावयाचे अनुदान हे शासनाच्या सर्वसाधारण नियम व निकषांनुसार असणे आवश्यक आहे. शासनाच्या सर्वसाधारण निकषांच्या बाहेर जाऊन अनुदान देणे नियमबाह्य ठरेल.

(५) पाटबंधारे आणि रस्त्यांच्या कामासाठी रोखे, कर्ज, इ. माध्यमातून निधी उपलब्ध होत असल्याने व या कामांसाठी मोठ्या प्रमाणावर नियतव्ययाची गरज असल्याने सामूहिक विकास क्षेत्रातील जसे आरोग्य, शिक्षण, इत्यादींसाठी निधीची प्राधान्याने शिफारस करण्यात यावी.

(६) प्रत्येक मंडळाने आपआपल्या महसूल क्षेत्रातील प्रत्येकी एक तालुका अतिमागास तालुका म्हणून निवड केलेला आहे. या निवड केलेल्या तालुक्यांच्या सर्वांगिण विकासासाठी तपशिलवार बृहत् योजना तयार करुन अशा तालुक्यांच्या विकास कामांसाठी पुढील ५ वर्षी प्रतिवर्षी किमान रु. २ कोटी निधी मंडळाने शिफारस करावा.

(७) विकास मंडळांनी त्यांच्या निधीतून घ्यावयाच्या कामांबाबत पुढील ५ वर्षांचा कार्यक्रम आखावा व त्याप्रमाणेच निधीची शिफारस करावी. तसेच मंडळांनी त्यांच्याकडे असलेल्या निधीचे समन्यायाने सर्व भागांमध्ये वाटप होईल हे पहावे.

विकास मंडळांनी शिफारस केलेल्या निधीतून कोणत्या प्रकारची कामे घ्यावीत याची यादी सोबतच्या प्रपत्र-१ मध्ये दिली आहे. त्याचप्रमाणे कोणती कामे घेण्यात येऊ नयेत याची यादी प्रपत्र-२ मध्ये देण्यात आली आहे. सदर यादी केवळ दिशादर्शक आहे व सर्वसमावेशक नाही. यास्तव विकास मंडळांनी शासनाच्या धोरणास अनुरुप व विहित धोरणात बसणारी अन्य कामे शिफारस करण्यास हरकत नाही.

प्रपत्र-१

## विकास मंडळांनी शिफारस केलेल्या निधीच्या अनुषंगाने घ्यावयाच्या अनुज्ञेय कामांची यादी

निर्देशांक व अनुशेष समितीने दर्शविलेल्या अनुशेषांतर्गत खालील कामे घेण्यात यावीत:-

(१) लघुपाटबंधारे (राज्य क्षेत्र)

(२) लघुपाटबंधारे (स्थानिक क्षेत्र)

(३) ग्रामीण रस्ते

(४) गावांना जोडणारे रस्ते (ॲप्रोच रोड्स)

(५) प्राथमिक शाळा खोल्यांची बांधकामे व दुरुस्ती

(६) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची बांधकामे व आवश्यक ती साहित्य खरेदी

(७) तांत्रिक शाळांची बांधकामे व आवश्यक ती साहित्य खरेदी

(८) +२ स्तरावर शिक्षणाच्या व्यावसायिकरणासंबधीच्या योजनांना अनुदान

(९) प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रे यांची बांधकामे व अवश्यक ती साहित्य खरेदी

(१०) ग्रामीण रुग्णालयांची बांधकामे व आवश्यक ती साहित्य खरेदी

(११) शासकीय रुग्णालयासाठी यंत्रसामुग्री खरेदी

(१२) ग्रामीण पाणीपुरवठा अंतर्गत कूपनलिका/विंधण विहीरी/नळाने पाणीपुरवठा

(१३) मृदसंधारणाची कामे

(१४) कृषि पॉलिक्लिनिक

(१५) सामाजिक वनिकरणाची कामे

(१६) पाणलोट क्षेत्र विकासाची कामे

(१७) कृत्रिम रेतन केंद्र/उपकेंद्र व पशुवैद्यकीय दवाखाने सुरु करण्यासाठी अनुदान

(१८) नगरपालिका क्षेत्रातील रस्ते, गटारी, मलनि:सारणाची कामे, सार्वजनिक स्वच्छतागृहे, स्मशानभूमीच्या कामासाठी अनुदान

(१९) ग्रामपंचायत कार्यालयाचे बांधकाम व गावातील सार्वजनिक स्वच्छतागृहे (ग्रामपंचायतीने देखभालीची जबाबदारी स्वीकारण्याच्या अटीवर)

(२०) दुग्धशाळा, शीतकरण केंद्रांची उभारणी व विस्तार

(२१) मत्स्यमारी बंदरे व जेट्टींची बांधकामे

(२२) महिला/अपंगांसाठी असलेल्या शासकीय योजनांकरिता अनुदान

(२३) पर्यावरणविषयक कामे

## प्रपत्र-२

## विकास मंडळांनी शिफारस केलेल्या निधीच्या अनुषंगाने अनुज्ञेय नसलेल्या कामांची यादी

(१) खाजगी संस्थेची अथवा विश्वस्त मंडळांची कोणतीही कामे

(२) खाजगी संस्थांना/सहकारी संस्थांना अनुदान/कर्ज

(३) कोणत्याही प्रकारची दुरुस्ती (प्राथमिक शाळा खोल्यांची दुरुस्ती वगळून) व परिरक्षणासाठी अनुदान

(४) स्मारके/स्मृतीगृहे यांची बांधकामे/परिरक्षणासाठी अनुदान

(५) गावातील अंतर्गत रस्ते